**प्रकाशक :**

**किरण आकाराम पाटील**

मु.पो. परखंदळे,
तालुका शाहुवाडी, जि. कोल्हापूर.
पिन. ४१६ २१३

**© प्रकाशकाधिन**

निरांकुश
मु.पो. परखंदळे,
तालुका शाहुवाडी, जि. कोल्हापूर.
पिन. ४१६ २१३
मोबा. : ७७७३९९५१५१
e-mail : ankushp21@gmail.co

**मुद्रक :**
**स्वरुप प्रेस,**
कोल्हापूर.

**अक्षर रचना :**
**अक्षय प्रिंटस् ,** कोल्हापूर.
**मो. ७३०४४२२९९२.**
**मुखपृष्ण**
**ओंकार तारू व सुमित चव्हाण**
कोल्हापूर.

**मूल्य : ४०/-**

**प्रकाशन तिथी :**
**२६ जानेवारी, २०१४**

e distribution by eSahity Pratishthan

## प्रस्तावना,

महाराष्ट्राच्या भूमीशी नाळ असणाऱ्या प्रत्येकाचं भावविश्व शिवाजीराजांनी व्यापलेलं असतं. राजेंशी जोडली गेलेली व्यक्ती सह्याद्रीशी आपसुकच जोडली जाते. शिवाजींच्या कर्तृत्वाने सह्याद्रीला वेगळी ओळख मिळवून दिलेली आहे. त्यामुळे शिवप्रेमींना सह्याद्री जास्तच जवळचा वाटतो. कवी निरांकुश यांनीही आपल्या पहिल्या काव्यसंग्रहामध्ये छत्रपती शिवाजी महाराज आणि सह्याद्री यांची महती गायलेली आहे. त्यांनी कवितेत स्वतःचा उल्लेख शिव-मावळा असा केलेला आहे आणि त्यांच्या मित्रपरिवाराने त्यांना प्रेमाने 'सह्यकवी' असे नामाभिधान दिल्याचंही त्यांनी आपल्या मनोगतात म्हटलेलं आहे. कवितासंग्रहाचं नावही 'सह्यगर्जना' असंच योजलेलं आहे. शिवछत्रपतींनी आणि सह्याद्री यांनी महाराष्ट्रात अनेक लेखक कवींना लिहीतं केलं. महात्मा फुलेंचा पोवाडा गोविंदाग्रजांनी लिहिलेला छत्रपती शिवाजीराजांचा पाळणा, सावरकरांनी लिहिलेली शिवरायांची आरती, पुरंदरेंचे जाणता राजा सारखे भव्य नाटक, गोनिदांची कादंबरी मालिका, कॉ. गोविंद पानसरेंचे शिवाजी कोण होते? सारखे वैचारिक लेखन अशी नाना प्रकृतींची लेखन आपल्याला पाहता येतील. कवी निरंकुशांसारख्या नव्यानं लेखनात पाऊल टाकणाऱ्या कवीलाही शिवाजीराजे आणि सह्याद्री यांनीच लिहितं केलेलं आहे.

राजा शिवाजी आणि सह्याद्री याविषयी प्रचंड आणि सार्थ अभिमान, त्यांच्या प्रेरणेतून घेतलेली स्फुल्लिंग यांनी निरांकुश याची कविता साकारलेली आहे. हा कवी शिवाजींच्या आणि सह्याद्रीच्या स्तुतीपाशी न थांबता, त्यांच्याशी असणारे स्वतःचे नाते शोधू पाहतो. यातल्या अनेक कविता सह्याद्रीमध्ये केलेल्या पदभ्रमंतीच गवसल्या असे कवीने स्वतःच म्हटलेले आहे. केवळ पुस्तकी अभिमानातून आली असती तर ही कविता आहे तितकी प्रामाणिक राहिली नसती. प्रत्यक्षानुभूतीतून येणारी प्रामाणिक अभिव्यक्ती हा

e distribution by eSahity Pratishthan

कवितेचा विशेष आहे. म्हणून शिवाजी राजांच्या पराक्रमाविषयी, त्यांच्या भव्य व्यक्तीमत्वाविषयी, त्यांच्या अतुलनीय सहकार्यांविषयी जशा कविता कवी लिहितो तसेच त्याला दूर्गसंवर्धनाविषयीही काही म्हणावेसे वाटते. कविला हेही उमगलंय की दूर्गसंवर्धन म्हणजे केवळ किल्ल्यांची डागडुजी नव्हे तर किल्ल्यांशी जोडलेल्या भव्योदत्त इतिहासाचे मना-बुद्धीत केलेलं जतन म्हणजे खरं दूर्ग संवर्धन.

कवीने केवळ अभिमानापोटी सह्यगर्जना साकारलेली नाही. 'महाराज, तुमची मार्केटमध्ये लय व्हॅल्यू हाय' सारख्या कवितेतून राजेंच्या नावाचा होणारा स्वार्थांध वापरही कवीने अधोरेखित केलेला आहे. 'शिवस्मारक' सारख्या कवितेतून शिवस्मारकाचे खरे स्वरूप आणि हेतू कवीने निर्देशित केलेला आहे. 'तीनदा जयंती' सारखी कविताही वर्तमानातल्या विसंगतीवर बोट ठेवते. महाराष्ट्राचे आणि मराठीचे मर्मस्थान असणाऱ्या विषयावर कवितामाला लिहून कवितेच्या प्रांगणात प्रवेश करणारे कवी निरांकुश उर्फ अंकुश पाटील यांचे यासाठी अभिनंदन करायला हवे.

विषय आणि आशयामध्ये उल्लेखनीय कामगिरी केल्यानंतर कवी निरांकुश यांनी कवितेच्या रचनेवर अधिक लक्षपूर्वक काम करायला हवे. हा त्यांचा पहिला संग्रह आहे. त्यांचे कविता लेखन काहीकाळ सातत्याने सुरू आहे. त्यांची कविता मित्रमंडळंमध्ये, श्रोत्यांमध्ये लोकप्रिय झाल्याचेही त्यांच्या मनोगतावरून लक्षात येते. राजे आणि सह्याद्री यांसारखे दैदिप्यमान विषय निवडले की, कवीचे काम काहीसे हलके होते पण असे करणे बरेच जोखमीचेही असते. कारण यामुळे कवितेच्या रचनेचे अवधान सुटू शकते. लोकप्रिय लकबींची खटक्याची सवय जडू शकते. कवितेची शब्दकळा, लयबद्धता, प्रतिमाव्यवहार, याबाबतीत कवी निरांकुश यांनी अधिक चिंतन करावे. यामुळे त्यांची कविता अधिक उठावदार होईल. कवितेचे चमकदार विधानांच्या पलीकडे जायला हवे. निरांकुशांचा काव्यप्रवास जसा विस्तारत जाईल तसे आरंभीच्या टप्प्यावर असणारे काही मोहही कमी होत जातील. यासाठी त्यांना मनःपूर्वक शुभेच्छा. सध्याच्या काळात दुर्मीळ होत चाललेला, खरेपणा, पारदर्शकता आणि प्रामाणिकता यांचे दर्शन घडविणारी आणि आपल्या दैवताची मनस्वी स्तुती गाणारी कविता आपल्याला 'सह्यगर्जना' मधून भेटते. कवीने आपल्या भविष्यातल्या प्रवासात ही शक्तीस्थळे कसोशीने जोपासावीत आणि महत्वाचे म्हणजे सतत लिहिते राहावे.

# *मनोगत.....*

नमस्कार,

प्रथमतः तुम्ही हे पुस्तक हाती घेतलंय या विचाराचं मी स्वागत करतो.

सह्यगर्जना म्हणजे सह्याद्रीची गर्जना. ज्या दऱ्याखोऱ्यात, कड्याकपारीत 'हर हर महादेव' अशी सिंहगर्जना झाली त्या कातळात फक्त दोनच आज्ञा पाळल्या जातात - एक शिवरायांची आणि दुसरी शंभूराजांची त्या सह्याद्रीची गर्जना.

मराठ्यांचा गौरवशाली इतिहास, धडपडणारा वर्तमान आणि वाट पाहणारा उत्तुंग भविष्य यांच्या स्फूर्तीदायी कविता या पुस्तकरूपाने तुमच्यासमोर मांडल्या आहेत आणि या वाचल्यावर मनात विचारांचं वादळ आणि भगवा पेलण्याची ताकद मनगटात निर्माण झाल्याशिवाय राहणार नाही याची खात्री देतो.

वयाच्या दहाव्या वर्षी हातात डफ घेऊन सुरू केलेलं गाणं, मनात शिवरायांच्या नावाचं वेड निर्माण करून गेलं. लिहिण्याची इच्छा होती. शब्दांची साथ होती पण प्रश्न होता लिहावं कशावर ? रायगडाची पदभ्रमंती केल्यावर अन् शिवरायांसमोर नतमस्तक झाल्यावर हा प्रश्न कायमचा सुटला

'मर्दाचं गावं गाणं मर्दानं
मर्दाचं लिहावं गाणं मर्दानं ।।'

लिहायला सुरूवात केली. अफाट, बेलगाम सह्याद्रीच्या गडावर...

बुरुजांवर आणि बुरुजांवर फडकणाया भगव्यावर... मराठ्यावर... मराठ्यांच्या गौरवशाली इतिहासावर.  भगव्या मातीवर लिहिताना मनात एकच विचार होता आपले काव्य मराठ्यांच्या घरापर्यंत आणि हा इतिहास मराठ्यांच्या हृदयापर्यंत पोहोचवायचा.

मराठे जेव्हा प्रोत्साहित होतात तेव्हा ते भव्यदिव्य, जगाला हेवा वाटेल असं घडवतात यास इतिहास साक्ष आहे. म्हणून प्रोत्साहित करणेसाठी मी शब्दातून इतिहास आणि वर्तमानाची भविष्याकडे जाणारी वाट शोधू लागलो जी आज तुमच्यापर्यंत पोहोचली आहे.

मित्रांमध्ये, कट्यावर, कॉलेज कार्यक्रमात याच कविता रंगू लागल्या.

कवितेनंतर मिळणारी दाद हीच आनंदाची गोष्ट होती.

आणि मी पोहोचतो आहे याचं समाधान...

सोशल नेटवर्क साईटवरून कविता, विचार व्यक्त करायचो तेव्हा समवैचारिक  व्यक्तींच्या प्रतिक्रिया यायच्या. यामध्ये महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागात शिवकार्य करणाया व्यक्ती होत्या. देशाबाहेरील शिवभक्त होते, अभ्यासू होते.या सर्वांनी पुस्तकरुपात कविता वाचायला जास्त आवडतील असं सुचवलं.  यापैकी गडवाट परिवाराने ‘सह्यकवी’ असं टोपणनांवच दिले.

या काव्य संग्रहास प्रस्तावना लिहिणारे श्री. हिमांशू स्मार्त, आणि मला मार्गदर्शन केलेले श्री. उदय गोसावी यांना मी मनःपूर्वक धन्यवाद देतो.

माझे सर्व शिक्षक व मित्र-मैत्रिणी यांचे मोलाचे सहकार्य लाभले. तसेच मला प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष मदत करणाया सर्व ज्ञात अज्ञातांचे मनःपूर्वक आभार.

आपले आशीर्वाद पाठीशी राहतील अशी अपेक्षा करतो अन ही वादळापूर्वीची शांतता थांबवतो.

- *निरांकुश*

# अनुक्रमणिका

# देवा मला पुढच्या जन्माला घालताना एक लक्षात ठेव

मी
दगड झालो तर
सह्याद्रीचा होऊ दे
माती झालो तर
रायगडाची होऊ दे
तलवार झालो तर
भवानी तलवार होऊ दे
वाघ नको
वाघनख्या होऊ दे
मंदिर नको
जगदिश्वराची पायरी होऊ दे
आणि माणूस म्हणून जन्माला आलोच
तर मराठा म्हणून शिवाजी कर
पण शिवाजी काशीद कर
असं देवा तुला जमणारच नसेल तर
मला पुन्हा जन्माला घालूच नको
मी याच जन्मी धन्य झालो महाराष्ट्रात जन्मून ।

# मी कुणाचा ?

मी कुणाचा ?

मी कुणाचा ?

मी कशाचा ?

हे कुणीही दाखवू नका

पिढ्यान् पिढ्या

शतको न् शतके

एकच मी सांगत आहे

कुणाची न जहांगीरी

न कुणाच्या पदरी

मजवरी राज्य फक्त दोहोंचे...
प्रथम शिवरायांचा गनिमी कावा
तद्नंतर शिवरायाचाच छावा.

# वारकरी

देव देवळात नाही
देव राऊळात नाही
उभा रायगडी देव
येण्या वाट माझी पाही ।

भक्ती उपासात नाही
भक्ती तपात नाही
उभा खिंडीत भक्त
प्राण पायावरी ठेवी ।

प्रसाद तीर्थात नाही
प्रसाद शिऱ्यात नाही
मिळे पायरीवर प्रसाद
पायधुळ मस्तकी लावी ।

वारी आषाढीत नाही
वारी कार्तिकेत नाही
माझी रायगडी वारी
जीव सार्थकी होई ।

हाव स्वर्गाची नाही
हाव लंकेची नाही
सह्याद्रीची मज हाव
गुणगान तयाचे गाई ।

# का पुन्हा जन्मायचे ?

खंत कशाला,
भगव्याचा रंग उजळला शिवनेरीवरी
दादागिरी ती काय कुणाची ?
सह्याद्रीवरी चढायचे...

नियती देते दान असे की
भगव्यामध्ये जे मावत नाही
आमचेच इथे फितुर निघाले
त्यांच्यासाठी का रडायचे ?

आपुलीच नाती आपुलीच माती
अभेद्य त्यांची छाती असते
म्हणुन का संकटाचे घरटे
स्वराज्यावर बांधायचे ?

मरण होते समोर परंतु
मरणाला तयार व्हायचे
माहिती होते प्रत्येकाला
तरीही पुन्हा ते घडायचे.

आम्ही असू षंढ
षंढ आपुल्या जाती
स्वराज्याचे सुराज्य न झाले
म्हणून का त्यांनी पुन्हा जन्मायचे ?

# गडवाट

सह्याद्रीच्या गिरीकेंद्राची एक नवी पहाट
जय जय शिवराय गर्जती मर्द मराठी गडवाट ।

मनामनात जागवू पुन्हा मराठी जात
विझल्या मशालीची पेटवू नव्याने वात
उभारूनी बुरुजावरी मर्द मराठा ताठ
जय जय शिवराय गर्जती मर्द मराठी गडवाट ।

धुंडाळू मुलुख मराठी गीत शौर्याचे गात
घेऊ अनंत मराठा आमुच्या एकसाथ
पुसुनी जाती-पातीची जुनी इथली वहीवाट
जय जय शिवराय गर्जती मर्द मराठी गडवाट ।

अटकेपार उधळूनी आम्ही घोड्याची टाप
भगव्यासाठी पुन्हा चालवू तलवारीची पात
गर्दीत मिळवूनी गनिमास पुन्हा एकदा थेट
जय जय शिवराय गर्जती मर्द मराठी गडवाट ।

जगास दाखवू आमुची मराठी एकसाथ
उद्धार करीतो देऊनी एकमेकांस हात
पायास घालीतो पाय, दाखवूनी त्यास मढेघाट
जय जय शिवराय गर्जती मर्द मराठी गडवाट ।

# ये बछड्या इकडे बघ

ये बछड्या आज थोडे इकडे बघ
मज सिंहाचा अवतार बघ
सिंहासम आयाळ माझी
मज डोळ्यातील आग बघ ।

ये बछड्या आज थोडे इकडे बघ
गडाचा प्रत्येक कोपरा बघ
प्रेमी युगुलांचा चाळा बघ
कोण नामर्दाची पैदास ही
एकदा तूच तपासुन बघ ।

ये बछड्या आज थोडे इकडे बघ
अशक्य उभा कडा बघ
त्यावर दोरीचे वळ बघ
घोरपडीसम कार्य आमुचे
परि या वाघाची झेप बघ ।

ये बछड्या आज थोडे इकडे बघ
ताठ मानेचा जरीपटका बघ
भगव्यामधील आमुचे रक्त बघ
कुणासाठी हे हिंदवी स्वराज्य ?
जरा शिवमहाराष्ट्राचा बंद डोळा बघ ।

# आबासाहेब

पक्ष्यांची किलबिल थांबली
रायगडची थंडी उबदार झाली
सारं आभाळ काळं झालं
भगव्याचं तडफडणं  सुरू झालं
बिछान्याच्या कोपऱ्यातून आवाज
छत्रपतींचा … आबासाहेबांचा…

बाजी, मला पालखीत बसायचंय…
तुमच्या खांद्यावरून रायगड पहायचाय…

तानाजी, माझ्या हातानी …
तुमच्या हातात सोन्याच कडं घालायचंय …

शिवा… शिवा…
माझं प्रतिबिंब आरशात पहायचंय

शंभु …
एकदा तुला जीवभरून मिठी मारायचीय…
जगदंब … जगदंब …

# मराठा त्यासी आम्ही म्हणितो...

जिजाऊंचे विचार अंगणी
शंभू छत्रपतींचे आचार अंगी
शिवरायांस देव जो मानितो
मराठा त्यासी आम्ही म्हणितो ।

सह्याद्रीची ढाल छातीवरती
पाठीमागून ना वार कधी
झुंजोनी मारीतो अथवा मरीतो
मराठा त्यासी आम्ही म्हणितो ।

भगवी पताका खांद्यावरती
समशेर चकाके हातामधी
कपाळी माय-मराठी लावितो
मराठा त्यासी आम्ही म्हणितो ।

अडखळले ना पाय उंबरठ्यांशी
गुंतलो ना नात्यात कधी
रणांगणाशी लग्न जो मानितो
मराठा त्यासी आम्ही म्हणितो ।।

फितुरांचे किती हे उसासे
उडवूनी डोईचे मुंडासे
अखंड महाराष्ट्र जो घडवितो
मराठा त्यासी आम्ही म्हणितो ।

इंद्रायणी काठावरची
अमोल अनंत ध्येयासक्ती
छातीस शंभूगाथा जो लावितो
मराठा त्यासी आम्ही म्हणितो ।

# क्षत्रियकुलावंतस राजा शिवछत्रपती

राजे झाले त्यापूर्वीही
राजे झाले त्यानंतरही
रयतेचा राजा मात्र तोच होता
बळीच्याच हातात भाजीचा देठ होता ।

प्रजा होती त्यापूर्वीही
प्रजा आहे त्यानंतरही
राजाची प्रजा मात्र तीच होती
राई-राई एवढ्या चिंधड्या करण्याची
धमक त्यांच्यात होती ।।

पराक्रमी होते त्यापूर्वीही
पराक्रमी झाले त्यानंतरही
स्वराज्याचे पराक्रमी तेच होते
गनिमांच्या रक्ताने गडाची पायरी धुत होते ।

राजे होते... होते महारथी
आमदार आहेत... आहेत राष्ट्रपती
रयतेचे मात्र एकच छत्रपती
क्षत्रियकुलावंतस राजा शिवछत्रपती...।

# गडवाट

तलवारीशी तलवार भिडेल
डोळे वाकडे कराल तर जिवंत गाढेल
आम्हा ना सांगु कुणाचा उतरायचा थाट
व्हाल स्वराज्याशी व्हाल ग-ार
सरळ आमच्याशी गाठ
होय रे होय... आम्हीच गडाचे बुरुज
अन् आमचीच हक्काची गडवाट...।

# दौलतीचे सुतक

जपुन टाका पाऊल फारच अरूंद आहे वाट
फितुरीची शतवर्षानी त्यात इथे वहीवाट।

पडतील गडकिल्ले, पडतील बुरुज
पसरेल साथीने चोहिकडे फक्त खरूज।

सदा एकटा शंभू समई वाचून राहतो उदास
पाहूनी अंधारालाही वाटेल जीवन भकास।

जागे झाले आता मावळे, जागे झाले भक्त
आसवे रोखून उभा राहिले राखण्या तख्त।

दौलतीचे सुतक म्हणाला, इथे भटक्या एक
करत बसला तुळजापुरी शंभूभक्तीचा अभिषेक।

पाहून सारे आज मी सांगत आहे।
नाही संपणार रक्त, नाही तुटणार गाठ
जोवर राहतील गडकिल्ले तोवर राहील गडवाट।

# मर्दास मानाचा मुजरा

कुणी उठवले फितुर, कुणी उठवले स्त्रीलंपट
कुणी ना उचले धैर्य ना गिरीकेंद्रातील रपेट ।

पातशाह्या पायदळी अन् नजर गगनासी
मर्दाची छाती टक्कर देते तोफांशी ।

विश्वासाच्या ठिकऱ्या उडवल्या स्वकीयांनी
परि अंती घुटने टेकले गनिमांनी ।

ना झुकविता मान दिली आपली जान
सह्याद्रीच्या राजावर जिंदगी आपली कुर्बान ।

हाच छावा, हाच सर्जा अन् हाच शिवयांचा मान
हेच शंभू, हेच संभाजी, हेच जिजाऊंची जान ।

शिवनीती रक्तामध्ये अन् पराक्रमाचे बाळकडू
पराक्रमाची गाथा घेऊनी शंभू उभा वद्धू ।

लिहिता पोवाडे मर्दाचे ना कधी येणार शरण
जगेन गाण्या गुणगान तद्नंतरच यावे मरण ।

अश्रू न यावे माझ्या डोळी गाता पराक्रमाची गाथा
मर्दास मानाचा मुजरा अन् टेकवितो माथा ।

# आम्हाला सुधारण्यासाठी...

महाराज,
आम्ही वाघनखे विकतो
विकतो कातडीसुद्धा
फक्त पोटासाठी...
गाव म्हणतं म्हणून फक्त यावं तुम्ही
आम्हाला सुधारण्यासाठी ।।

बाजी, तानाजी, कोंडाजी
आता इथं रहात नाहीत
इथं राहतात नवे मराठे
ते फक्त आपली जात बघतात
आपलं काम आलं की
शेपूट घालून करून घेतात
जीव तडफडतो त्यांचा पण स्वार्थासाठी
गाव म्हणतं म्हणून...।।

भगव्याला आता
हिरव्या निळ्याची सोबत नाही
लांब लांब केसात
जरीपटका आता राहीला नाही
फडकत राहतो जरीपटका भगवा
पडक्याच बुरुजावर
वेळच नाही इथं त्याकडे पाहण्यासाठी
गाव म्हणतं म्हणून...।।

# मरणाची भीती कुणाला ?

मरणाची भीती कुणाला ?
मरण तर पुजलंय पाचवीला
असेल औरंग्या अजुन कुठं
तर एकदा येऊन दाखव महाराष्ट्राला... ।

पाहूनीच घाम फुटेल मराठी वेषाला
यायची छातीच नाही होणार या देशाला
बोलणं कमी अन् करून दाखवणं
हाच आमुचा सलाम आमच्या आवेशाला

शत्रूही मित्र केला
शिवरायांचा जयजयकार केला
हिरव्या मुलुखाला
भगवा झेंडा फडकला... ।

# मराठी गडी यशाचा धनी

बाजींनी दाखविला पुरुषार्थ
हाच मराठा शोभतो सार्थ
एकटा वाघ उभा राहीला खिंडीत
घोडखिंड झाली पावन रक्तानी
मराठी गडी, यशाचा धनी ।

हिरोजींनी उभारीला गडांचा गड
मोबदला मागितला मंदिराची पायरी
व्हावा धुळीचा अभिषेक मस्तकी
उभी रायगडी, मराठ्यांची राजधानी
मराठी गडी, यशाचा धनी ।

रुबाबदार पेहराव, पोलादी छाती
मिशीला पीळ, टिळा भगवा मस्तकी
राहील पुन्हा त्याच ताकदिनी
मराठी गडी, यशाचा धनी ।

कितीही आम्ही असलो विभागूनी
नाहीच होणार कुणाची छाती अडवण्याची
दाखवेन रक्ताचा पुन्हा अभिषेक करूनी
मराठी गडी, यशाचा धनी ।

# मराठा माझा

आणखी किती देश सांभाळायचा आम्ही
अरे देशसुद्धा चालवेल मराठा माझा
किती दिवस गोळ्या झेलायच्या आम्ही
अरे जिवंत तुडविल मराठा माझा
तुम्ही वाघ असाल यात शंका नाही
वाघनख्यांनीच संपवेल शत्रूला मराठा माझा
आणखी किती तख्त सांभाळायची आम्ही
अरे दिल्लीच्याही तख्तावरी बसावा मराठा माझा ।

# अफाट सह्याद्री

नाही कुणाची चाकरी
नाही कुणाच्या पदरी
नाही कुणाच्या बापाची
ही मराठ्यांची जहांगिरी
माझा अफाट सह्याद्री

एक प्रवास रायगडचा
जणू हिमालयाशी भिडण्याचा
शुन्यातून नवे जग साकारणारा
अन् नव्या निर्मितीची चाहूल देणारा

नजर सुद्धा थोटकी पडली
अफाट सह्याद्री पाहताना
उरसुद्धा कमी पडला उरात रायगड साठवताना ।।

## महाराज तुमची मार्केटमध्ये लय वॅल्यु हाय

मनातील छबी पुसट होती
टी-शर्टवर लय झ्याक हाय
महाराज तुमची मार्केटात लय वॅल्यु हाय...

पुतळ्यांकडे आता कुणाचंच लक्ष नाय
बाजारात मात्र हँगरला तुमच्यासकट टी शर्ट हाय
महाराज तुमची मार्केटात लय वॅल्यु हाय..

आता हात उठत नाय मुजऱ्याला
तुमच्याच फोटोसाठी कॅमेरा हातात हाय
महाराज तुमची मार्केटात लय वॅल्यु हाय..

तानाजी, बाजी, फुलाजी एकावर एक फ्री हाय
महाराज तुम्हाला मात्र अंगठी-कीचेनवर जागा हाय
महाराज तुमची मार्केटात लय वॅल्यु हाय..

तुम्हाला डोक्यावर घेतलं, डोक्यात मात्र कुणीच नाय
फक्त फॅशन म्हणून नावासमोर सगळ्यांच्या राजे हाय
महाराज तुमची मार्केटात लय वॅल्यु हाय..

महाराज खरंच...
माणसाला आता रंग आलाय
जातीप्रमाणे तुम्हाला रंग दिलाय
प्रत्येक मंडळाच्या नावात
पक्षांच्या झेंड्यावर...
सगळीकडे तुमचाच वापर हाय...
महाराज तुमची मार्केटात लय वॅल्यु हाय..

# शिवस्मारक

चार चार जयंत्या
तुमच्या महाराज
खरी कोणती यावरच असतो आमचा वाद

एकतीस डिसेंबरला होतील पार्ट्या
राजं तुमच्याच गडावर
आम्ही फक्त पहात बसू
ठेऊन हात-हातावर
सांगा तुम्हीच कसा जावू गडावर
तो अगोदरच बुक असतो
कुणा राजकारण्याच्या सांगण्यावरनं
कुठलं स्मारक ?
अन् कशाचं काय ?
मराठ्यांचा इतिहास फक्त पुस्तकात हाय
तुम्हीच सांगा अरबी समुद्र आपला होताच कुठे...?
स्मारक फक्त मतदानाचं सोंग हाय
तुम्हाला तर राजे महाराष्ट्रातच चोरी हाय ।

# हंबीररावमामा

अंधारले ढग सारे
मावळले रान सारे
जेव्हा रायगड आमुचा कंपला
तेव्हा भगवा आमुचा रडला ।

गादीची ती मोहित काया
शिवचरणांची गंधीत माया
कुणास जमेल स्वराज्य
अन् कोण मराठ्यांचा राया... ?

क्षितीजाच्या फितुरी लाटा
स्वराज्यावर उलटल्या
सह्याद्रीच्या रांगा साऱ्या
नव्या आशेने एकवटल्या...

मुजरा करीतो हंबीररावमामाला
सारुनी बाजूला
देऊनी फाटा नात्याला
मराठ्यांचा महारथी केला छाव्याला... ।

# समर्पण

पोलादी छातीत माझ्या ठोकोनिया खिळा
मलाच लावा गडास आता मानोनिया शिळा ।

शरीरातीलही तोडोनी टाका भगव्याशिवाय शिरा
माझ्या चितेचीही राख वापरा भरण्या गडांच्याही चीरा ।

आता नाहीच मिळणार शिसे भरण्या गडांचे तख्त
संपलो तरी बेहत्तर पण वापरा माझ्या अंगातील हे रक्त।

कुणी मिळो न मिळो किल्लेदारीस आपल्या समवेत
माझेच मढे अंथरा दोस्तहो गडवाटेच्या कवेत ।।

# घोडखिंड

घोडखिंडीच्या गवताच्या पात्यांनी
आज मला प्रश्न केले
राजे गडावर पोहोचले की,
बाजी अर्ध्यावरच सोडून गेले ?

मी जरा घाबरतच उत्तर दिले
राजे सुखरुप पोहोचलेपण... पण...
बाजी सर्वांना सोडून गेले ।

ते ही त्याच रक्तातून उगवलेले
डोळे वटारून मलाच म्हणाले,
मग आता...?
राजे ही गेले, बाजीही गेले
त्यानंतर तुम्ही काय केले... ?
राजांना डोक्यावरून फिरविले की
मनात उतरवलें...?

बाजींना इथंच दफन केले की...
काळजावर कोरून ठेवलें...?

घोडखिंडीच्या गवताच्या पात्यांनी
आज मला प्रश्न केले

मलाही आता उमगत नाही
नुसतीच गवताची पाती होती की होते भाले ?
ताठ मानेने होते आजही
मग आम्हीच का खड्ग म्यान केले ?

# मी स्वतंत्र

जातीच्या भींतीत मला अडवू नका
मी स्वतंत्र आहे, स्वावलंबी आहे ।
मनाचे कित्ते गिरवू नका
उगाच जाती-पातीचे झेंडे मिरवू नका ।

प्रांताच्या कुंपणात मला अडवु नका
मी जाणता आहे, मी स्वाभिमानी आहे
जनाचे पत्ते जुळवू नका
उगाच माती-मेणाचे पुतळे बनवू नका ।

स्वतःच्या डोक्यावर घेऊन मला नाचवू नका
मी माणूस आहे, माणूसकी माझा धर्म आहे
कुणाचे मिंधे होऊ नका
उगाच माझ्या नावे पक्ष चालवणे देऊ नका ।

गाढू नका ना सांडू नका
उगाच आपसात भांडू नका
आम्ही नसू ना संत, ना षंढ्
आला परका अंगावर
त्याला तसाच सोडू नका ।

# आम्ही असे नाही

जंजिरा आम्ही जिंकला नाही
मग पाणी का कापत आहे
आम्ही पुढे न येता तोच का येत आहे...?

औरंग्याला आम्ही मारला नाही
मग सुलतानी जीभा का गप्प आहेत
आम्ही न झुकता तोच घुटने  का टेकत आहे...?

आम्ही वाघ ही नाही अन् सिंह नाही
मग आमच्या जवळ यायला शत्रू का भित आहे
बिन दाताच्या जबड्यात नुसतीच जीभ कशी आहे...?

अफझुल्या आम्हाला घाबरलाही नव्हता
मग का कोण विसरत नाही
बिन आतड्याचा प्रतापगडावर कोथळा कोणाचा आहे...?

# दुर्गसंवर्धन ।

हृदयाचे सांगणे गडगडणाऱ्या मेघांना
जाऊनी सांगा शिवभक्तांना
गटा-तटांनी... तटा-तटांनी
साद घालू सह्याद्रीच्या गडांना ।

नोकरी आहे, पैसा आहे
आता समाजकार्य करूया
नाहीच जमलं सगळं करायला
किमान थोडं तरी शिवकार्य करू या ।

धुंद आहे... बेताल आहे
आता जरा बाण्याने जगुया
नाही जमलं असं जगायला
किमान माय - मराठीला मस्तक टेकवू या ।

स्वतंत्र आहे, स्वराज्य आहे
आता सुराज्य घडवू या
नाहीच जमलं सर्वांना सुधारायला
किमान दुर्ग संवर्धन करु या ।।

# साक्षीची शिळा

आपलाच आपल्याला परका होतो
वेदनेने दगडच आता बोलता होतो
दगडावरची प्रत्येक जखम वाहू लागली
साक्षीच्या शीळेची आज मला हाक आली ।

दानवही आता मेल्यावर देव होतो
वेडा मराठाही संतानासाठी त्याकडे धाव घेतो
शत्रूच्याच कबरीला अत्तराची बरसात झाली
साक्षीच्या शीळेची आज मला हाक आली ।

मावळा ही आता फिरायला तिथं गाव नेतो
दोन-चार कोंबड्यांवर दारुसह ताव मारतो
गडावरच पराक्रमाची चोरी झाली
साक्षीच्या शीळेची आज मला हाक आली ।

त्याच शिळेवर कुणी स्वतःचं नाव लिहितो
बापासह खानदानाची निशाण लावतो
शिळेलाच इतिहासजमा व्हायची वेळ आली
साक्षीच्या शीळेची आज मला हाक आली ।

## शिळेची इच्छा

पुरुनी उरतो आम्हीच इथे, शिळा सांगती कथा
आज पहावी त्या शिळांची दगडासारखीच व्यथा ।

कुणीही येतो लिहूनी जातो प्रेयसीचे नाव
शिळेलाही माहीत फक्त पराक्रमाचेच नाव ।

तिमिरालाही कधी नव्हता माहीत शिळेचाही पत्ता
आज इथे फक्त त्यावर काळोखाचीच सत्ता ।

आज मलाही भेटायचे आहे दरीतील शिळेला ।
पहायचे आहे तिची आहे का इच्छा राखणे परत गडाला।

## भगवा झेंडा

कुणी न यावे आम्हास पुसाया
जात - धर्माचा अजेंडा
आम्हीच ते वेडे हाती घेऊनी फिरतो
शिवरायाचा भगवा झेंडा ।

# राजे तुम्ही एकदा येवुन जा

विसरलाय स्वाभिमान प्रत्येक मराठा
विसरलाय स्वतःचीच अस्मिता
त्याच्या डोळ्यात थोडं अंजन घालून जा
राजे तुम्ही एकदा येऊन जा ।

तलवारीसुद्धा झाल्यात गवताची पाती
विसरलोच आम्ही आपापसातली नाती
विस्कटलेली घरटी एकत्र करून जा
राजे तुम्ही एकदा येऊन जा ।

गडकिल्ले झालेत पर्यटनस्थळे
राजकीय नेत्यांची विश्रांतीस्थळे
या गडकोटांना हक्काची गडवाट देऊन जा
राजे तुम्ही एकदा येऊन जा ।

चुरगाळलीत पाने इतिहासाची
राजे तुमच्या पराक्रमाची
इतिहासाच्या पुस्तकाला व्यवस्थित कव्हर घालून जा
राजे तुम्ही एकदा येऊन जा ।

उशीरा का होईना
एकदा तरी येऊन जा
नाहीच जमलं राजे तुम्हाला यायला
या सह्याद्रीला पुन्हा छावा तरी देऊन जा ।

# सह्याद्री।

श्वास तू , भास तू
जाणत्या मनाची आस तू
भाव तू , गाव तू
माझ्या मनीचा राव तू ।

छावा तू , धावा तू
माझ्या राजांचा गनिमी कावा तू
वाद तू , संवाद तू
मर्दाच्या अंतरीचा नाद तू ।

संत तू , कांत तू
देशाच्या गनिमाचा अंत तू
वाट तू , भवानीचा लल्लाट तू
जन्मोजन्मी आमुच्या साथ तू ।

तानाजी तू , रायबा तू
माझा मायबाप शिवबा तू
भाऊ तू , आऊ तू
माझी आई जिजाऊ तू ।

इतिहास तू , भूगोल तू
तव शौर्याचा सुर्यगोल तू
वर्तमान तू , भविष्य तू
माझ्या हृदयाचं आयुष्य तू
जीवन तू , मरण तू
मज पामराचं स्फूरण तू
डफावरची साद तू , पराक्रमाची याद तू
समस्त मराठी मनाचा अंतर्नाद तू ।

# जीवनाचा अर्थ शिवाजी

अशीच जन्मावी मुलं
खेळावी जीवाशी
जीवनाकडे उलटे पाहिल्यावर समजेल
जीवनाचा अर्थ शिवाजी ।

घडवावा सच्चा वारसदार
बापानेही व्हावं समर्थ बाप
जीवनाच्या संध्याकाळी
मुलं अभिमानाने देईल
आपणास साथ ।

नाही जमलं बापाला
शिवाजी व्हायला
आईने पहावं जमतंय का
जिजाऊ व्हायला ।

# वारसदार हिंदवी स्वराज्याचे

हे स्वराज्य फुकट नाही
यात आहे स्वाभिमान
त्याग अन् बलिदान ।

कुणाचा तरी बाप
अन् कुणाचा तरी मुलगा
कुणाचा तरी नवरा
अन् सती गेलेली बायको ।

कुणाचे तरी धड अन्
तोफेला बांधलेले
निष्ठावान  शीर
कुणाचे फितुरीचे उसासे
अन् कुणाचे डोक्याचे मुंडासे ।

फुकट नाही की
सवलत नाही
हे दान प्राक्तनाचे
मराठ्यांच्या पराक्रमाचे
गडांच्या बुरुजाचे
अन् रक्तात न्हालेल्या मातीचे ।

पुन्हा नाही असं जमणार
पुन्हा उभारणे
जबाबदारी आहे टिकवणे
अथवा लयाला घालवणे
प्रेयसीला घेऊन गडावर जाणे की
हाती फावडे घेऊन साफसफाईला जाणे ।

असेल नाते कुणाशी रक्ताचे
तर कुणाशी श्वासाचे
याआधी असू वारसदार
हिंदवी स्वराज्याचे
मातीसाठी जगू अथवा
मातीतच खपू ।

# स्वराज्याचा राणा

अंधार दिसता,
क्षितीजावरी
कुणी गेला उतराया, स्वराज्याचा भगवा ।
तोच उगवला, सूर्य आकाशी
गरजला
स्वराज्याचा राणा
मराठ्यांचा राजा जाहला
सह्याद्रीचा छावा ।

# पेटून उठावे आता

शिवरायांची गरज लागली
देश वाचवण्या आम्हा
रायगडी टेकवूनी माथा
गड्यांनो, पेटून उठावे आता ।।

मंत्रालये ती जळू लागली
घोटाळे जाळण्या आपले
त्व दोषी संपवूनी टाकू
घेण्या आपुल्या हाती सत्ता ।।

शत्रूची ती नजर वाकडी
देश संपवण्या आपला
आतंकवादी तो ठोकूनी टाकू
मानण्या प्रजेने आपणास त्राता ।

स्विस बँकेत रुपया ठेवी
संपत्ती लपवण्या आपली
धनदांडग्यांना बदडोनी काढू
होण्या सकलजनांचा अन्नदाता ।

टेबलाखालूनी देतो नोटा
काम होण्यास आपुले
भ्रष्टाचारास गाढूनी टाकू
करण्या भ्रष्टाचारी तो थोटा ।

होऊ बाजी, तानाजी, फुलाजी
मातीसाठी प्राणपणाला लावू
स्वराज्याचे सुराज्य करण्या
तव फुगवू छातीचा भाता ।

मुलगीला तो खुडून टाकतो
दिवा लावण्या वंशाचा
जिजाऊ ती वाचवूनी दावू
होण्या शिवराज्याची माता ।

रायगडी टेकवू माथा
गड्यांनो पेटून उठावे आता ।।

# मीच मावळा, मीच मराठा।

मातीसाठी खपतो आम्ही
कुढत जगणे जमत नाही
लढत-लढतच मरतो आम्ही
मेलो तरीही संपत नाही ।

स्वराज्याचे तोरण बांधले
यया-गबाळ्याची संगत नाही
मुजरा करतो फक्त राजांना
उगाच कुणापुढे झुकत नाही ।

किती तलवारींचे वार जाहले
तोडले तरीही तुटत नाही
मीच, मावळा मीच मराठा
कोथळ्याशिवाय परतत नाही ।

वेळे आधीही मरण आले
नजरसुद्धा झुकवत नाही
गनिमच टेकतो गुडघे आपुले
आम्ही कधीच वाकत नाही ।

भगव्यासाठीच मरण आमुचे
लाचारीने जीणे जमत नाही
स्वराज्यासाठी मरण पत्करणे
सह्याद्रीशिवाय कुठं घडत नाही ।

# शौर्याचे पोवाडे

आमुच्या शौर्याचे पोवाडे
ना थोडे ना थोडके
त्याचेच आज इथे
मी गातो पोवाडे ।

मुलुखाचा ना आम्हाला
कधी लागला किनारा
अटकेपारही देईन
मराठ्यांचा नारा ।

रंगाचेही धंदे
ना जमले कधीही
असे मातीचाच टिळा
मज पामराच्या कपाळी ।

आम्हास ना भीकेचे
कधी लागले डोहाळे
पडले कितीही किल्ले
मज वाटती ही देवळे ।

नाही थांबणार कधीही
शब्दांची हमाली
सारीच जिंदगी
मायभूमीच्या हवाली ।

# त्यानंतर...

आम्ही ना पाहीला देव शिवरायांनतर
जन्मलाच नाही वाघाचा छावा शंभूराजांनंतर ।।

स्वराज्याला नेहमीच दगा होता फितुरांचा
त्यांनीही घेतला धसका टकमक टोका नंतर ।

नख्यांनीही भुईसपाट करता येते शिकारीला
समजले वाघालाच अफझुल्याच्या कोथळ्यानंतर।

युद्धाला असते भीती नवीन युक्त्यांची
जरब बसविली चांगलीच गनिमी काव्यानंतर ।

तेज पाहता समोर रांगड्या मराठ्याचे
कुणी ना जन्मला शत्रू औरंग्यानंतर ।

यावी डोळ्यात चमक माझ्या कवितेने
अन् छाती ही उंच फुगावी या काव्यानंतर ।

# अभिलाषा

उरात घेउनी
चालूनी येतो
जिंकण्याची ती
...अभिलाषा ।।

सह्याद्री ही अशी
जी संपवते
मी पणाच्या
...साऱ्या रेषा ।।

दुर्गराजाच्या कवेत
गडवाट माझी
घेऊनी जाते...

बुरुजाच्या शीळेसम
जीवन आमुचे
सार्थकी लागते...

# शंभुगाथा

इंद्रायणीचा काठ आता
रड-रड रडतो आहे
रडता रडता अश्रूंमध्ये
पुन्हा एकदा भिजतो आहे ।

भगवे घेऊन निशाण हाती
शंभू आता गर्जतो आहे ।

सह्याद्रीच्या कड्यांनो
पुन्हा एकदा कवेत घ्या
सुल्तानीच्या जीभांनी
शंभूगाथा वदवून घ्या ।।

# मराठे

कितीही झाले घाव
परि जाणार नाही मिटून
सह्याद्री ही ढाल आमुची
तलवारच जाईल तुटून ।

कित्येक आले, कित्येक गेले
तगले नाही कोणी
भगवा आमुचा रक्षक अन्
शिवराय आमुचे धनी ।

फितुरीची जळमटे जरी
भूतकाळी आमुच्या टांगली
भविष्याच्या मेघांनीच
गाथा आमुची गायली ।।

कुणास वाटली जात ही
कुणास वाटली भुते
गनिमाच्या स्वप्नी दिसतो
तेच आम्ही मराठे ।।

# भगवेच कफन

नसेल आम्हा पाय परि
उरात आहे हिंमत
शिवराय आमचे ध्येय अन्
पायधुळ आमची किंमत ।

नसूदे आम्हास डोळा
उजवा अथवा डावा
नजर देतो आम्हास
आमचा सर्जा छावा ।

कशास हवेत हात आम्हा
मिठीत आहे अंबर
सह्याद्रीच कुस आमची
अन् रायगड आमचे झुंबर ।

कशाला हवेत श्वास आम्हा
कशास हवी धडकन
खेळावे भगवे रक्त अंगी
अथवा व्हावे भगवेच कफन ।।

# ऐक मराठ्या साथ दे

ऐक मराठ्या साथ दे , फक्त तुझा हात दे ।।
गडवाटेत मशाल पेटवू , फक्त तुझी वात दे ।

ऐक मराठ्या साथ दे , फक्त तुझा हात दे ।
अटकेपार झेंडा फडकवू , फक्त घोड्याची टाप दे ।
ऐक मराठ्या साथ दे , फक्त तुझा हात दे
रोमां-रोमांत शिवराय जागवू , फक्त डफावरती थाप दे ।

ऐक मराठ्या साथ दे , फक्त तुझा हात दे
हिमालयासही खिंडार पाडू , फक्त तुझी कात दे ।

ऐक मराठ्या साथ दे , फक्त तुझा हात दे
सुर्यालाही दिपवुनी टाकू , फक्त तुझी रात दे ।

ऐक मराठ्या साथ दे , फक्त तुझा हात दे
जग सारे भगवे करू , फक्त तुझी जात दे ।

# इंद्रायणी

संगमाचा ना माज कधी
परि आज अभिमान वाटतो
सह्याद्रीचा छावा माझा
जेव्हा नजर मजवरी टाकतो ।

होती गाथा तुकोबाचीही मजपाशी
थेंब-थेंब माझा भक्तीने भेटतो
कुठवर जाईल थेंब माझा
शंभूसाठी गळा आज इथे दाटतो ।

समोर होता हत्ती परि
सिंह कोठे ? कुणासाठी झुकतो.
लालबुंद डोळ्यानीच
मुघली सल्तनत फाडतो

झबल्याची वरात झाली
मध्यमुघल आनंदाने नाचतो
लांडग्यांच्या टोळीत या
शंभूच छावा टिकतो ।।

# जात !

घाव झेलूनी छातीवरती ।
रंग राखला मातीचा
भगवा सह्याद्री ज्या छातीचा
मी मराठा त्या जातीचा ।।

वाचवण्या आपल्या राजाला
गळा घोटतो खिंडीचा
तो बाजीप्रभू ज्या जातीचा
मी मराठा त्या जातीचा ।।

धींड निघता शंभूची
कंठ दाटतो मित्राचा
तो रामा महार ज्या जातीचा
मी मराठा त्या जातीचा ।।

सागरावरी लावूनी झेंडा
मान राखितो भगव्याचा
तो दौलतखान ज्या जातीचा
मी मराठा त्या जातीचा ।।

स्वराज्याचं स्वप्न साकारण्या
जीव संपतो वरबापाचा
तो तानाजी मालुसरे ज्या जातीचा
मी मराठा त्या जातीचा ||

फसवण्या त्या गनिमाला
वेश करीतो राजाचा
तो शिवा काशिद ज्या जातीचा
मी मराठा त्या जातीचा ||

लावूनी टिळा मातीचा
अभिमान बाळगतो जातीचा
मी सह्याद्रीच्या कातीचा
मराठा मी भगव्या जातीचा |

# अर्ध्यावर भगवा

काळंबेरं होतं की
होतं खरंच देवाचं बोलावणं
राजं का होतं तेव्हा
सगळ्यांचंच संशय़ी वागणं !
खरंच राजं तुम्ही गेला तेव्हा
सह्याद्रीच्या कड्यावरून
अश्रूंचा पूर वाहीला होता
भगवाही अर्ध्यावरून
तुम्हास मुजरा करीत होता ।।

राजं आबासाहेब... आबासाहेब करत
शंभू गुडघ्यावर बसला होता
सिंहासन नको मला
एकदा कुशीत घ्या म्हणाला होता ।

स्वराज्याच्या सेनापतींना
तुम्हीच दिला होता ना सल्ला ?
स्वराज्य रक्षकांनीच का मग
छत्रपतींसाठी केला कल्ला ।

स्वराज्याच्या वारसाला
का ठेवायचं होतं डांबून ?
तुमच्याशिवाय सिंहासन
का पहायचे होते लांबून ।।

राजं अफझल्याच्या पोटातीलही
खबर होती ना तुम्हास
शंभूविरोधी कारस्थाने
का माहीत नव्हती तुम्हास ?

बुरुजाआडचं राजकारण
राजं शंभूने कधीच केलं नाही
सांगण्याबाहेर तुमच्या
कधीच वागणं केलं नाही ।

स्वराज्याची अन् भगव्याची तमा नसावी
राजं एकदा फक्त परतून या
वारसदाराला स्वराज्याच्या
आबासाहेबांच्या कवेत घ्या ।

# एक पाऊल !

एक पाऊल माझ्या सह्याद्रीचं
एक भगव्या जरीपटक्याचं ।

एक खिंडीतल्या बाजीचं
एक पन्हाळ्याच्या शिवाचं ।

एक मुरारबाजीचं
एक तानाजी मालुसरेचं ।

एक एक पाऊल आईचं
एक सईचं... एक वारसदाराचं ।

उभा ज्या पायावरती
ते माझ्या रयतेचं
मराठी मातीचं... हिंदवी स्वराज्याचं ।

मी शिवाजी शहाजी भोसले
आज राजे होतोय
सेवा आपुली करण्या
माझं जीणं सार्थक करण्या
हात ठेवूनी शिरावरती
द्या आशीर्वाद छत्रपती ।।

# भगवी पताका
# कधीच खाली ठेवणार नाही

मी कवी झालो नाही तरी चालेल
पण लिहिणे कधीच बंद करणार नाही ।

मी प्रसिद्ध झालो नाही तरी चालेल
पण धुळीत कधीच पडणार नाही ।

मी वाघ झालो नाही तरी चालेल
पण मांजरासारखं कधीच जगणार नाही ।

मी वारकरी झालो नाही तरी चालेल
पण रायगडची वारी कधीच चुकवणार नाही ।

मला ऑक्सिजन मिळाला नाही तरी चालेल
पण गडावरची हवा घेणं कधीच थांबणार नाही ।

मला मंदिर मिळालं नाही तरी चालेल
पण भगवी पताका कधीच खाली ठेवणार नाही ।

मला अजून जगायला मिळालं नाही तरी चालेल
पण माझ्या राजाचे गाणे म्हंटल्याशिवाय मरणार नाही।

# देवा मला एकदा तरी तुला भेटायचंय...

देवा मला एकदा तरी तुला भेटायचंय...
रायबाचं लग्न
न लावताच आलेल्या तानाजींना
लग्नाला बोलावायचंय...
देवा एकदा तरी...

पावनखिंडीत
तोफेच्या आवाजावर
सोडून जाणाऱ्या बाजींना
पालखीचा मान द्यायचाय...
देवा एकदा तरी...

जंजिऱ्यासाठी
तोफेला शीर बांधलेल्या कोंडाजींना घेऊन
जंजिऱ्यावर भगवा फडकावायचाय...
देवा एकदा तरी...

देवा महाराजांना भेटवलं नाहीत तरी चालेल
पण एकदा शिवा काशीदना भेटव
माझ्या राजाचं प्रतिबिंब मला पहायचय
देवा एकदा तरी....

एकदा हसत हसत मरतात कसं
या मर्दांना विचारायचंय
अन् भगवात लपेटून
पुन्हा देवा तुझ्याकडेच यायचंय...

# मुद्रा शिवरायांची

वाटले होते यवनांस
संपले मराठे
भुते सह्याद्रीचे
जेव्हा पाहिली चिता
पहिल्या छत्रपतींची
नव्हती चाहूल तेव्हा
एकासही सिंहाच्या छाव्याची...
नव्हता बगलबच्चा
ना कच्छा-लुच्छा
गिरीकेंद्राची रपेट ती
घोड्याची टाप ती
पात तलवारीची ती
तुळापुरीची भवानी ती
रायगडाची माती ती
भगव्याची किनार ती
मराठ्यांची मान ती ।
अन् यवनांच्या कपाळी आठी ती
जगास सारे बोलले
पुरंदराच्या कवेत जन्मले
संभाजी शिवाजी भोसले...
हरपली सावली
माय माउलीची

होती छाया
माँ जिजाऊंची
धाराऊ ती
माऊली दुधाची ।
इंग्रजास तुडविले
पोर्तुगीज गाडले
स्वकीय पातळी धाडले
औरंग्या शोधू लागला कबर
जेव्हा रुद्राची मिळाली खबर ।
दुहीचा तो शाप मराठ्याला
पडला पथ्याला
गण्या शिर्के तो
मिळाला औरंग्याला...
चढवले झबले अंगाला
बांधले साखळदंडाला
मराठ्यांच्या राजाला
कसले ते पाप
कसले देवाचे माप
ना कळले बुरुजाला
बुरुजाच्या तटाला
ना तटाच्या मावळ्याला ।।
इंद्रायणीच्या काठाला
खेळ चालला
घाबरवण्या मृत्यूला ।
शंभू उभा ठाकला ।

डोळ्यांस निकामी केले
परि डोळ्यांनी भगव्यास पाहिले
जिव्हेस त्या छाटीले
जय जय शिवराय गर्जले
उडविले शिरास जेव्हा
गातो सह्याद्रीचे गाणे
तो वीर अभिमानी...

रंग नही रग था उसमें
खरगोश नहीं शेर था उसमें
आती दुनियाभी टकराने
कहती बच्चा नहीं सबका बाप था उसमें ।।

टेकुनी घुटने औरंग्या
म्हणतो अल्लास
वाहतो अत्तर तुजला
तुच वाचवले माझ्या जीवाला ।

जात मर्दाची
पोलादी छातीची
औलाद मराठ्याची
ओरडून सांगे
लेखणी अंकुशाची
हीच मुद्रा शिवरायांची
स्वाभिमानी शंभुरायाची...

# साखळदंड

विचारा त्या साखळदंडाला
अजून लालबुंद डोळे दिसतात का ?
कुणी नजर देणारा
अजून भेटतो का ?

विचारा त्या साखळदंडाला
अजून असा कुणी आहे का ?
समोर गुढघ्यावर बसणारा
जन्माला येतो का ?

विचारा त्या साखळदंडाला
रगेल होते की रंगेल
सच्चा वारसदार
आता तरी दिसतो का ?

विचारा त्या साखळदंडाला
तुला गंज चढला आहे ना ?
मग परीसस्पर्शाचा
तुला अभिमान का ?

विचारा त्या साखळदंडाला
अजून वास येतो का ?
कुणी मराठा
अजून हवा आहे का ?

# मराठेशाहीचा सूर्य

महाराज रडण्याचा उत्सव झाला
लढण्याचा आता करणार आहे
मराठ्यांच्या मातीत
पुन्हा शिवशाही आणणार आहे...

आला आडवा आपला अथवा परका
तुडवून पुढे निघणार आहे
फक्त अन् फक्त भगव्यासाठी
जगणार अन् मरणार आहे...

राज्य व्हावे ही तर श्रींची इच्छा
आमुचा वेद मंत्र असणार आहे
इतिहासातील मावळ्यांसारखेच
भगव्याखाली एकवटणार आहे...

फितुर कुणी निघणार नाही
निष्ठावंतांचीच फौज असणार आहे
सह्याद्रीच्या कातळाला
पुन्हा भगवा फासणार आहे...

डफावर थाप अन् घोड्यांची टाप
एकाचवेळी पडणार आहे
स्वराज्य अन् सुराज्याचा झेंडा
पुन्हा अटकेपार रोवणार आहे...

प्रत्येक बुरुज अन् प्रत्येक खिंड
आम्ही एकदा जागवणार आहे
गडवाटेत मशाल अन्
तोफ गडावर डागणार आहे...

स्वार्थासाठी जगणार्यांचं
एकदा मस्तक पेटवणार आहे
मराठेशाहीचा सूर्य
पुन्हा महाराष्ट्रावर आणणार आहे...

# तीनदा जयंती

राजं आज पुन्यांदा आम्ही
तुमची जयंती साजरी केली
भगव्याकडे पाहण्याची
कुणाची टाप नाही झाला ।

दुसऱ्या जयंतीचा होता तरीही
घरांना रंग दिला
काठी होती घरावर
आज त्यावर भगवा लावला ।

कुणी ज्योत गडावरून तर
कुणी गावातून स्वच्छता केली
कुणी लाऊड स्पीकर तर
कुणी मंडपाची तयारी केली ।

मागच्या जयंतीची तसवीर तुमची
फक्त आम्ही पुसुन आणली
कुणी 'जय भवानी... ' तर
कुणी 'क्षत्रियकुलावंतस्य्'ची आरोळी दिली ।

नेहमी सारखे आजही महाराज
तुमची जयंती आम्ही साजरी केली
इतर महात्मे जन्मले एकदाच
तुमची मात्र तिसरी जयंती केली ।

तुमचाच मावळा स्वराज्याचा
फक्त जय-जय म्हणतो आहे
तुमच्या विचारांचे पाणी
फक्त डोक्यावरून वाहतो आहे ।

खरंच सांगतो राजे,
बरं झालं तुम्ही जन्मला तीनदा
आम्ही तेवढ्या वेळा तरी तुम्हाला आठवतो
नाही तर तुमची तसबीर असती धुळीत
अन् कोण छत्रपति शिवराय म्हणालो असतो ।

# शिव-मावळा !

गडवाटेच्या कवेतून
बुरुजावर भगवा फडकताना पाहून
पायात घोड्यांची चपळता येते
सह्याद्रीचं फक्त नाव घेतलं की,
चातकाप्रमाणे हिंडण्या फिरण्याची तहान लागते...

ओठावर रायगड येताच
आईच्या चाहूलीने
पाऊले धन्याच्या भेटीला वळतात
इंद्रायणी काठी साखळदंड हाती घेताच
ढसाढसा रडायला लागतो...

इतिहासाच्या पानात हरवलेले वीर
भगव्या भूमीत शोधत फिरतो
भगवा पाहून ओठांवर
'क्षत्रियकुलावंतस' आरोळी येते...
असा इसम तुम्हाला भेटला तर समजा
मराठा रियासतीचे वेड लागलेला
'शिव-मावळा' तुम्हाला भेटला आहे...